**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील**
**<u>अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०१०/प्र.क्र. १०९/ आस्था-३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- ६ जुलै, २०१०**

**<u>आदेश</u> :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील खालील अधिका-यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिका-यांची नियुक्ती त्यांच्या नांवासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद व कार्यालय | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.ए.डी.ठाकरे | उप मुख्य कार्यकारी (सा.प्र.) जिल्हा परिषद यवतमाळ | उप मुख्य कार्यकारी (बा.क.) जिल्हा परिषद अमरावती | रिक्त जागी |
| २ | श्री.बी.डब्लू.दिवाण | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) जिल्हा परिषद अमरावती | सहायक आयुक्त(तपासणी), विभागीय आयुक्त कार्यालय,अमरावती | श्री.एस.बी.धर्माळे यांच्या जागी |
| ३ | श्री.एस.बी.धर्माळे | सहायक आयुक्त(तपासणी), विभागीय आयुक्त कार्यालय,अमरावती | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) जिल्हा परिषद नागपूर | रिक्त जागी |
| ४. | श्री.सी.डी.बंड | गट विकास अधिकारी पंचायत समिती, वरुड जि.प.अमरावती | गट विकास अधिकारी पंचायत समिती आर्णि जिल्हा परिषद यवतमाळ | श्री.बी.डी.जाधव यांच्या जागी |
| ५ | श्री.व्ही.जी.रोडे | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.) जि.प.वाशिम | गट विकास अधिकारी पंचायत समिती, वरुड जि.अमरावती | श्री.सी.डी.बंड यांच्या जागी |

**२.** संबंधित अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक

३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

**३.** संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिका-यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००७०६१५१२१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

विभागीय आयुक्त, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
**संबंधित अधिकारी द्वारा मु.का.अ.जि.प यांचे मार्फत**
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.